**उपजिल्हाधिकारी (अपील्स) मुंबई उपनगर हे पद जमाबंदी आयुक्त, भुमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे या कार्यालयाच्या आस्थापनेवर DILRMP ई-फेरफार प्रकल्पाचा "विषयतज्ञ गट" म्हणून वर्ग करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१८/प्र.क्र.१२६/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. ०८ सप्टेंबर, २०२०.

**संदर्भ:** १) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचे दि. २७.०६.२०१४ चे पत्र.
२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक,भुमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे यांचे दि.१०.०६.२०१९ चे पत्र.
३) वित्त विभाग , शासन निर्णय दि.०९.०६.२०१७ अन्वये गठित अमुस(सेवा) साप्रवि व सचिव व्यय, वित्त विभाग यांच्या दि. १७ .०७.२०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

जमाबंदी आयुक्त व संचालक, भुमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे यांच्या आस्थपनेवर ई-फेरफार प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी राज्य समन्वयक ई- फेरफार म्हणून तसेच ई-फेरफार प्रकल्प वेळेत पुर्ण होण्याच्या दृष्टीने सदर प्रकल्पावर पूर्णवेळ उपजिल्हाधिकारी हे पद आवश्यक असल्याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक,भुमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये शासनास विनंती करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये विभागीय आयुक्त , कोकण विभाग, कोकण यांनी मुंबई उपनगर जिल्हयातील उपजिल्हाधिकारी (अपिल्स) हे पद निरसित करण्यात येवून सदर पदाकडील अपिलाचे कामकाज हे अपर जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडे वर्ग करण्याबाबत विनंती करण्यात आली आहे.

३. ई-फेरफार हा शासनाचा महत्वाकांक्षी प्रकल्प आहे. सदर प्रकल्प वेळेत पुर्ण होण्याच्या दृष्टीने या प्रकल्पावर पूर्णवेळ उपजिल्हाधिकारी हे पद असणे आवश्यक आहे.

४. संदर्भ क्र.३ अन्वये झालेल्या मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीच्या बैठकीमध्ये मुंबई उपनगर जिल्ह्यातील उपजिल्हाधिकारी (अपील्स) हे पद जमाबंदी आयुक्त, भुमी अभिलेख (महाराष्ट्र), पुणे या कार्यालयाच्या आस्थापनेवर उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार म्हणून वर्ग (रुपांतरित) करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

उपरोक्त बाबी विचारात घेता मुंबई उपनगर जिल्ह्यातील उपजिल्हाधिकारी (अपील्स) हे पद जमाबंदी आयुक्त, भुमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे या कार्यालयाच्या आस्थापनेवर उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार म्हणून वर्ग(रुपांतरित) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मुंबई उपनगर जिल्ह्यातील उपजिल्हाधिकारी (अपील्स) हे पद जमाबंदी आयुक्त, भुमी अभिलेख (महाराष्ट्र), पुणे या कार्यालयाच्या आस्थापनेवर उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार म्हणून वर्ग (रुपांतरित) करण्यास शासन मान्यता देत आहे.

०२. उपजिल्हाधिकारी (अपील्स) व जमाबंदी आयुक्त, भुमी अभिलेख (महाराष्ट्र), पुणे या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार ही दोन्ही पदे समकक्ष असल्याने शासनावर कोणताही वित्तिय भार निर्माण होणार नाही.

०३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५०८/आपूक, दि.१०/१०/२०१९ अन्वये दिलल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२००९०८१४३८३१२०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2020.09.09 15:30:15 +05'30'

**(अजित देशमुख)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक,भुमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर
३. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
४. जिल्हाधिकारी, पुणे.
५. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), -१ महाराष्ट्र, मुंबई.
७. वित्त विभाग/व्यय-९/विनियम, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. निवडनस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग.